अधिसंख्य पदावर नियुक्तीबाबत...
श्री.शहाजी चंद्रसेन पांढरे, बहुउद्देशिय
आरोग्य कर्मचारी पुरूष

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२४/प्र.क्र.१०३/आरोग्य-३
१० वा मजला , गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१
दिनांक: १ एप्रिल, २०२४.

वाचा -

१) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९**
२) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.१८७अे/१६-ब, दिनांक ३०/६/२०२० व दिनांक २८/९/२०२०**
३) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.असंप-२०२०/प्र.क्र.२९/आरोग्य-३, दिनांक-०५/०१/२०२१.**
४) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.असंप-२०२०/प्र.क्र.२९/आरोग्य-३, दिनांक-११/०१/२०२२.**
५) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक-१४/१०/२०२२.**
६) **आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे कार्यालय यांचे पत्र जाक्र.ससंआसे/आस्था/कक्ष-५५अ/श्री.पांढरे/अधिसंख्य/नाव समावेशन/न.क्र.०८/११२२-२४/२४, दि.१०.०१.२०२४**

**शासन आदेश** :-

ज्याअर्थी श्री. शहाजी चंद्रसेन पांढरे यांना जिल्हा निवड समितीमार्फत शिफारसपात्र उमेदवार म्हणून जिल्हा हिवताप अधिकारी कार्यालय, धाराशिव (उस्मानाबाद) या कार्यालयात बहुउद्देशिय आरोग्य कर्मचारी पुरुष या पदावर अनुसुचित जमाती या प्रवर्गाकरिता राखीव असलेल्या जागेवर जिल्हा हिवताप अधिकारी कार्यालय, धाराशिव (उस्मानाबाद) यांचे कार्यालयीन आदेश जा.क्र आक-नियु/७४६९-७७/९९, दि.०४.१२.१९९९ अनुसार नियुक्ती देण्यात आली होती;

ज्याअर्थी श्री. शहाजी चंद्रसेन पांढरे यांचे अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे त्यांच्या सेवा वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र, पाटोदा,ता. व जि.धाराशिव (उस्मानाबाद) या कार्यालयाच्या आदेश जा.क्र.प्राआकें/पाटोदा/आस्था/३०९/२०००, दि.२३.०५.२००० रोजीच्या आदेशान्वये समाप्त करण्यात आल्या होत्या.

ज्याअर्थी सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९ अन्वये अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्याच्या कारणास्तव यापुर्वी

सेवा समाप्त करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१ अन्वये विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार अधिसंख्य पदे तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर नेमणूक देण्याबाबत आदेश देण्यात आले आहेत;

त्याअर्थी श्री. शहाजी चंद्रसेन पांढरे यांना या आदेशाच्या दिनांकापासून बहुउद्देशिय आरोग्य कर्मचारी पुरुष या पदाच्या अधिसंख्य पदावर तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर नेमणुक देण्यात येत आहे.

श्री. शहाजी चंद्रसेन पांढरे यांच्या सेवासमाप्तीपासून ते ११ महिन्यांसाठी अधिसंख्य पदावरील नियुक्ती दरम्यानच्या कालावधीत ते सेवेत नसल्याने त्यांना कोणतेही सेवाविषयक तसेच आर्थिक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

श्री. शहाजी चंद्रसेन पांढरे यांना ते सेवेत राहिले असते तर त्यांना जेवढे वेतन मिळाले असते तेवढे दरमहा वेतन त्यांना पुढील आदेश होईपर्यंत देण्यात येईल.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२६१२०१५९४३१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.04.01 12:40:31 +05'30'

(क.प्र. पिसे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र १/ २, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

२) मा. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई

३) मा.संचालक १/२, आरोग्य सेवा, मुंबई/पुणे

४) मा.सहसंचालक,आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्य रोग)/(कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे-६

५) मा.उपसंचालक, आरोग्य सेवा, लातुर मंडळ, लातुर

६) जिल्हा आरोग्य अधिकारी कार्यालय, धाराशिव

७) जिल्हा हिवताप अधिकारी कार्यालय, धाराशिव

८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी/ अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

९) श्री. शहाजी चंद्रसेन पांढरे, बहुउद्देशिय आरोग्य कर्मचारी (पुरुष), जिल्हा हिवताप अधिकारी कार्यालय, धाराशिव. (सहसंचालक, आरोग्य सेवा पुणे यांच्यामार्फत)

१०) निवडनस्ती (आरोग्य-३)